सेवाग्रामला कां आले ? एक तर १९३० साली स्वातंत्र्य मिळवीन तेव्हां आश्रमांत परत येईन असें म्हणून ते दांडीयात्रेला निघाले. साबरमतीचा तो ऐतिहासिक आश्रम त्यांनीं हरिजनकार्यास देऊन टाकला. मग आतां कोठें राहायचें ? गुजरात विद्यापीठ बंद झालें. या विद्यापीठांतून उद्यां ग्रामसेवक मिळतील या आशेनें महात्माजींनीं तें सुरू केलें होतें. परंतु ती आशा विफल झाली. मग तें चालवून काय करायचें ? कोठें मिळतील ग्रामसेवक ? ग्रामोद्योगाचे निरनिराळे प्रयोग करायचे आहेत. कोठें मिळतील भरपूर माणसें ? त्यांचें लक्ष विनोबाजींकडे गेलें. आणि स्वर्गीय जमनालालजीहि तेथें होते. पुन्हां वर्धा मध्यवर्ती ठिकाण. सर्वांना भेटायला बरें. परंतु मुख्य आकर्षण येथील व्रती सेवकांचें होतें.

### सेवामय मित्रमंडळ—

विनोबाजींचे भाऊ, त्यांचे सारे बरोबरचे मित्र आज त्यांच्याभोंवतीं आहेत. श्री. मोघेजी, श्री. वाळूंजकरजी, श्री. गोपाळराव काळे, श्री. धोत्रेजी, सारे विनोबाजींचे बडोद्याचे स्नेही. हे सारे कित्येक वर्षें सेवा करीत आहेत. हिंदुस्थानांत महारोग्यासाठीं फक्त मिशनरी लोकांनीं दवाखाने चालविले आहेत. आपण काय करीत आहोंत ? परंतु विनोबाजींचे स्नेही श्री. प्रभाकरजी यांनीं महारोग्यांच्या सेवेला वाहून घेतलें व वर्ध्याजवळ महारोग्यासाठीं सुंदर व आदर्श असें रुग्णालय चालविलें आहे. आणि श्री. वाळूंजकरजी यांनीं चर्मालयाला वाहून घेतलें. गुरें मरतात; त्यांचें कातडें कसें काढावें, चरबी कशी काढावी, खूर वगैरेंतून सरस कसा काढावा, हाडांचें खत कसें करावें हें दाखविण्यासाठीं त्यांनीं आदर्श चर्मालय सुरू केलें. अशा प्रकारें

विनोबाजींभोंवतालची मंडळी राष्ट्रसंवर्धक व राष्ट्रोद्धारक कार्यांत रात्रंदिवस मग्न आहे. निरहंकारपणें परंतु शास्त्रीय अशी सेवा सुरू आहे.

प्रेमळ विनोबाजी—

विनोबाजी कठोर वाटले तरी ते तसे नाहींत. सभोंवतालच्या मुलांवर त्यांचें किती प्रेम! हीं मुलें लहानाचीं मोठीं त्यांच्या आश्रमांत झालीं. विनोबाजींचा पट्टशिष्य म्हणजे वल्लभ. वल्लभाला त्यांनीं वाढविलें, शिकविलें. वल्लभ आज वेद वाचतो, उपनिषदें जाणतो, सुंदर चर्चा करितो. कोणतेंहि काम व्यवस्थित करतो. विनोबाजी त्या त्या मुलांना त्यांना झेंपेल असें शिकवतात. श्री. अण्णासाहेब दास्ताने यांचा मुलगा दत्तु आश्रमांतच मोठा झाला. त्याच्याजवळ विनोबाजी शांकरभाष्य वाचतात. त्यांनीं सभोंवतालच्या तरुणांना नुसतें कामसू नाहीं केलें, तर त्यांना विचारहि दिले आहेत. विचार करण्याची शक्तीहि दिली आहे. आणि या तरुणांवर त्यांचें किती प्रेम! त्या मुलांनीं चालविलेले प्रयोग, त्यांच्या गोष्टी ते किती प्रेमानें सांगतात! भाऊ पानसे रोज सूत्रयज्ञ करणारा. त्याच्यावर एकदां शस्त्रक्रिया करण्यांत आली होती. सूत्रयज्ञाचें व्रत का आज मोडणार? परंतु पडल्या पडल्याच भाऊनें कसें कांतलें तें सांगतांना विनोबाजी गहिंवरले होते. कोणी आजारी पडला, कोणाचें वजन कमी झालें तर त्याला दूध देतील, त्याच्यावर प्रयोग करतील. आश्रमांत गोखलेजी म्हणून एक आध्यात्मिक वृत्तीचे तरुण आहेत. ते इंजिनियरच्या शेवटच्या परीक्षेंत पहिल्या वर्गांत आले होते. परंतु ३३।३४ सालापासून ते महात्माजींच्या साधनेकडे वळले. नुकतेच पास झालेले परंतु सॉर सोडून ते मुमुक्षु होऊन बाहेर पडले. कांहीं दिवस सासवडच्या आश्रमांत राहून ते विनोबाजींकडे गेले. ते अत्यन्त अशक्त होते. आजारी असत. क्षय होईल कीं काय असें वाटे. परंतु

विनोबाजींनीं त्यांच्यावर प्रयोग सुरू केले. गायीच्या दुधाचें दहीं भरपूर देऊं लागलें आणि वजन वाढूं लागले. १९४२ च्या एप्रिल-मे महिन्याच्या सुमारास विनोबाजी धुळें जेलमध्यें मला भेटायला आले होते. प. खानदेशच्या दौऱ्यासाठीं आले होते. मलाहि भेटायला आले. त्यावेळेस गोखलेजींवर केलेला प्रयोग सांगतांना त्यांना किती आनंद होत होता !

विनोबाजी आश्रमीयांचे आईबाप आहेत. कधीं कठोर होतात, रागावतात. परंतु आईचा हळुवारपणा व प्रेमळपणाहि त्यांच्याजवळ आहे.

### मी का तुमची उष्टेखळी ?—

फैजपूर कॉंग्रेसच्या वेळेस विनोबाजी आम्हां खानदेशी कॉंग्रेस-सेवकांस अडचणींत धीर व सल्ला देण्यासाठीं, तसेंच आम्हां सर्वांत ऐक्य रहावें म्हणून आधींपासून येऊन बसले होते. खानदेशला विनोबाजी घरचे वाटतात. खानदेशानें कितीतरी माणसें त्यांना दिलीं आहेत. धुळें जेलमध्यें निकट संबंध आले. आम्ही आमचीं भांडणें त्यांच्याकडे नेतों. ते गंमतीनें म्हणतात " मी का तुमची उष्टेखळी ? सारी घाण माझ्याजवळ आणून टाकतां वाटतें ? " विनोबाजींचें खानदेशवर प्रेम आहे. फैजपूरला कॉंग्रेसचें काम सुरू झालें. परंतु मुसळधार पाऊस पडला. पुन्हां का कॉंग्रेसची जागा बदलतात, अशी भीति आम्हांला वाटली तर विनोबाजी म्हणायचे " मी येथें पाय रोवून बसलों आहे. भिऊं नका. "

### चरखा अविरोधी श्रमाची खूण—

फैजपूरला कॉंग्रेसच्या अधिवेशनाची तयारी सुरू करतांना आरंभीं

विनोबाजींच्या हस्तें ध्वजारोपण झालें. राष्ट्रीय ध्वज उभारतांना ते म्हणाले, "या ध्वजावर चरख्याचें चित्र आहे. चरखा अविरोधी श्रमाचें प्रतीक आहे. हा झेंडा सर्वांना काम देईल, बेकारी दूर करील. आजच्या यांत्रिक भांडवलशाही उद्योगांत स्पर्धा आहे आणि त्यामुळें युद्धें. चरखा स्पर्धाहीन उद्योग देईल."

सुभानसाठीं चिखलांतून पायीं आले—

विनोबाजी त्या पावसांत फैजपूरला होते. धीर देत होते. आणि धुळें जेलमध्यें त्यांच्या निकट परिचयाचा झालेला सुभान नांवाचा मुलगा आपल्या घरीं आजारी आहे असें त्यांना कळलें. सुभानला ३० सालीं फटके बसले होते. ३२ सालीं तो पुन्हां तुरुंगांत होता. नंतर नगरच्या आयुर्वेद महाविद्यालयांत तो शिकत होता. तो आपल्या घरीं आला होता. तापानें आजारी पडला. विनोबाजींना सुभानचा तेजस्वीपणा आवडे. धुळें जेलमध्यें गीताप्रवचन झाल्यावर तहान लागली तर ते सुभानला पाणी आणण्यास सांगायचे. सुभान आजारी आहे असें कळतांच ते निघाले. भादली स्टेशनवर उतरून पायीं निघाले. खानदेशांतील काळ्या जमिनीचीं तीं शेतें! ढोपर ढोपर चिखल! बाभळीचे काटे त्यांत पडलेले! पाऊस पडत आहे! परंतु विनोबाजी तशांतून सुभानच्या त्या लहान झोपडींत आले. सुभानच्या आईला धन्य वाटलें. गांवांतल्या लोकांना आश्चर्य वाटलें. दोन दिवस त्याच्याकडे राहिले व जातांना म्हणाले "आतां बरा होशील. तुझा ताप मी घेऊन जातो हो."

माझ्यासाठीं कढत पाणी ठेवीत—

फैजपूर कॉंग्रेसचा खानदेशभर प्रचार करींत मी हिंडत होतों.

माझा घसा साफ बसला होता. विनोबाजी म्हणाले, "रात्रीं कढत पाणी पिण्यासाठीं माझ्या खोलींत या. कढत पाणी, त्यांत गाईचें तूप व थोडें मीठ असें घ्या. मी सारें करून ठेवीन. तुम्ही या." मी दोन दिवस गेलों. तिसऱ्या दिवशीं उशीर झाला म्हणून गेलों नाहीं. दुसऱ्या दिवशीं मला म्हणाले "गुरुजी, किती वाट पाहिली ? कां नाहीं आलेत ? संकोच वाटला वाटतें ?"

शेगडी घेऊन माझ्याजवळ आले—

मी जरा संकोची. दूर दूर असणारा. एकदां मी विनोबाजींबरोबर होतों. पहाटेची प्रार्थना झाली. खूप थंडी पडली होती. यजमानानें निखारे भरलेली शेगडी विनोबाजींजवळ ठेवली. विनोबाजी शेकत होते. मी दूर एका बाजूस बसलों होतों. मी जवळ येत नाहीं असें पाहून शेगडी उचलून तेच माझ्याजवळ आले व म्हणाले "पर्वत महंमदाकडे न आला तर महंमदानें पर्वताकडे गेलें पाहिजे" आणि हंसले. मी लाजलों.

घोंगडीवर ही खादीची चादर घालतों—

मी एकदां पवनारला त्यांच्याकडे गेलों होतों. पवनार वर्ध्या-जवळचेंच गांव. रात्रीं मी माझी घोंगडी पसरून पडलों. परंतु तिकडून विनोबाजी आले. "गुरुजी, उठा. घोंगडीवर ही खादीची चादर घालतों मग स्वस्थ झोंपा" असें म्हणून स्वतः ती चादर त्यांनीं घातली. चादर म्हणजे खादीचा स्वच्छ पंचा होता. असे ते प्रेमळ आहेत.

कोरें पत्र—

ते मला नेहमीं म्हणायचे, कीं पत्र पाठवीत जा. परंतु मी मनांत

म्हणायचा लिहूं तरी काय ? बरेच दिवसांत त्यांना मीं पत्र लिहिलें नाहीं. त्यांचें एक पत्र आलें " दुसऱ्याला आपल्यासाठीं ताटकळत ठेवणें म्हणजे हिंसाच आहे." तरी मी पत्र लिहिलें नाहीं. शेवटीं त्यांनीं मला एक कोरें कार्ड लिहिलें ! खालीं नुसते " विनोबाचे सप्रेम प्रणाम " असें होतें. बाकी सर्व कार्ड कोरें ! मी शरमलों व त्यांना एक मोठें पत्र लिहिलें.

जनता म्हणजेच जनार्दन—

मीं एकदां त्यांना लिहिलें " कोठें तरी देवासाठीं जाऊन बसावें असें मनांत येतें." त्यांनीं लिहिलें " कोठें जाणार ? तीर्थांचें पावित्र्य-हि राहिलें नाहीं. आणि देव सभोंवतीं नाहीं का ? आजुबाजूचे लोक म्हणजेच परमेश्वर अशी माझी भावना नसती, तर मी कधींच हिमालयांत निघून गेलों असतों."

तुमच्या आवडीचेंच काम करा—

मीच इच्छा दर्शविल्यावरून पूर्व-पश्चिम खानदेशच्या सीमेवर " नावरानावरी " या गांवीं विनोबाजींनीं आश्रम सुरू करून मला ठेवलें. परंतु एके दिवशीं अकस्मात् मी तेथून नाहींसा झालों. कोठें गेलों ? विनोबाजी संचित झाले. शेवटीं माझा पत्ता त्यांना कळला. त्यांनीं लिहिलें " गुरुजी, तुमच्या चिंतेनें व्याकुळ झालों होतों. तुमची ईश्वरावर श्रद्धा असल्यामुळें कोठेंतरी सुखरूप असाल अशी श्रद्धा होती. तेथलें काम नसेल आवडत तर दुसरें आवडीचें हातीं घ्या. तुम्हीच म्हणालेत म्हणून मीं तुम्हांला तेथें बसविलें. ज्याचा त्याचा कल पाहूनच मी सांगतों.

' तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् '

खरें ना ? "

विजेसारखें क्षणभर लख्ख करतां. स्थिर नंदादीप हवा—

मीं त्यांना फैजपूर काँग्रेसच्या वेळेस लिहिलें "पूर्व खानदेशांत या वर्षीं दहा हजार काँग्रेसचे सभासद करण्याचा मीं संकल्प केला आहे." त्या काळांत फारसे सभासद कोणी करीत नसे. महाराष्ट्रांत प्रथमच एका जिल्ह्यांत दहा हजार सभासद करण्याचा तो प्रसंग होता. पुढें मग काँग्रेसचीं मंत्रिमंडळें आल्यावर वीस वीस पंचवीस पंचवीस हजार सभासदहि कांहीं जिल्हे करूं लागले. विनोबाजींनीं मला लिहिलें "तुमचें सारें काम विजेसारखें. मनांत आणाल तेव्हां वाटेल तितकें काम करतां. नाहीं म्हणजे कांहीं नाहीं. सतत व स्थिर काम हवें. वीज क्षणभर, पुन्हां अंधार. स्थिर नंदादीप हवा."

तुम्ही कांहीं कबूल करीत जाऊं नका—

मला लोक सभांसाठीं वगैरे बोलवायचे. तोंडावर नाहीं म्हणणें मला जड जातें. मी होय म्हणतों. परंतु मागून येतां येत नाहीं असें कांहींतरी कळवितों. विनोबाजींनाहि मी वर्ध्याला येईन असें कबूल करायचा. परंतु जाणें व्हायचें नाहीं. एकदां विनोबाजी म्हणाले "गुरुजी, कोणाला कांहीं कबूल नका करीत जाऊं. 'बघेन जमलें तर' असें म्हणा. परंतु नक्की सांगत नका जाऊं. खोटेपणाचा दोष येणार नाहीं. कबूल केलेलें पाळवत नाहीं मग दुसरा काय इलाज?"

परंतु मी माझ्या व विनोबाजींच्याच गोष्टी सांगत बसलों. त्यांचें माझ्यावर प्रेम आहे. माझी त्यांच्यावर भक्ति आहे. परंतु कर्मानें मी त्यांच्यापासून दूर आहें. त्यांच्या प्रेमाला मी पात्र नाहीं. ती त्यांची उदारता आहे. असो.

तुम्हांला फक्त गुलामगिरी शक्य आहे !—

एकदां रागानें विनोबाजी धुळ्यांतील एका सभेत म्हणाले " आम्हांला सारें अशक्य वाटत असतें. खादी विकत घेणें अशक्य. काँग्रेसचें सभासद होणें अशक्य. चारसहा महिने तुरुंगांत जाणें अशक्य. अशा लोकांना जगांत एकच शक्य आहे. तें म्हणजे गुलाम राहणें ! "

स्वतःच्या दोषांची जाणीव—

विनोबाजींना अहंकार नाहीं. पश्चिम खानदेशांत सवाई मुकटी येथील ही गोष्ट आहे. तेथें खादीधारी-संमेलन होतें. पूर्व खानदेशांतलेहि पुष्कळ कार्यकर्ते आले होते. त्यांत जळगांवजवळील असोदें गांवचे श्री. चावदसभाऊ होते. चावदसभाऊ फार भावनाप्रधान. विनोबाजीं-जवळ त्यांचें कांहीं बोलणें चाललें होतें. विनोबाजी त्यांना जरा रागानें म्हणाले " चरख्यावर चांगली गति नाहीं. तकलीवर नीट गति नाहीं. ती तर आधीं मिळवा. उगीच दुसऱ्या उठाठेवी आधीं कशाला ? " अशा अर्थाचें विनोबाजी कांहींतरी बोलले. चावदसभाऊंना फार वाईट वाटलें. ते पायीं एकदम निघून गेले. आणि विनोबाजींना तें कळलें. त्यांना वाईट वाटलें. रात्र गेली. प्रातःप्रार्थना झाली. त्या प्रार्थनेंत

" माझे मज कळों येती अवगुण
काय करूं मन अनावर "

हा अभंग त्यांनींच म्हटला. आणि मागून थोडें प्रवचन त्यांनीं केलें. चावदसभाऊंच्या गोष्टीचा त्यांनीं उल्लेख केला. ते म्हणाले " मी जरा रागानें बोललों. तो भला माणूस एकदम निघून जाईल असें मला

वाटलें नाहीं. परंतु झालें खरें असें. क्रोध थोडाहि आला तरी वाईट. लगेच आपण आंधळे होतों. लगेच चुकतों. असो. माणसेंच आपण सारीं. चुका होणारच. सांभाळणारा तो प्रभु."

त्या वेळची विनोबाजींची ती सकंप व करुण वाणी मी कधीं विसरणार नाहीं.

नम्रतेची मूर्ति—

विनोबाजी किती नम्र आहेत तें मी कसें सांगू? परंतु एकदां पंडित मोतिलाल नेहरू वर्ध्याच्या आश्रमांत आले होते. ती भव्य, त्यागमयी मूर्ति पाहून विनोबाजींनीं साष्टांग नमस्कार केला.

महात्माजी आतां नेहमींच वर्ध्याजवळ आहेत. परंतु पूर्वीं साबर-मतीस असत. ते जेव्हां वर्ध्याच्या आश्रमांत येत तेव्हां विनोबाजी म्हणायचे "तुम्ही येथें आहांत तोंवर मी कोणी नाहीं. येथें असाल तोंवर तुम्ही चालक, तुम्ही पाहणारे."

मी वर्ध्यांत नाहीं राहिलों; तुमच्या आज्ञेंत राहिलों—

वर्ध्याचा आश्रम सुरू होऊन बारा वर्षें झालीं होतीं. आपण आतां फकिराप्रमाणें सर्वत्र हिंडत फिरावें असें विनोबाजींच्या मनांत येऊं लागलें. त्यांनीं महात्माजींस ती इच्छा कळविली. त्यांनीं एक पत्र लिहिलें. त्यांत त्यांनीं पुढील वाक्य लिहिलें होतें:

"गेलीं बारा वर्षें मी वर्ध्यांत नव्हतों रहात. तुमच्या आज्ञेंत रहात होतों."

परंतु विनोबाजी फकीर होऊन बाहेर पडले नाहींत. कारण ग्रामो-द्योग, गोरक्षण, वर्धाशिक्षण, नाना गोष्टी आल्या. आणि विनोबाजी त्यांत रमले. विनोबाजी म्हणाले, "महात्माजींच्या प्रतिभेला अंत नाहीं.

ते नवीन नवीन काढीतच असतात. ख्रिस्त एकदां म्हणाला, 'कोळी मासे पकडतो. मी माणसें पकडतों.' तसें महात्माजींचें आहे. ते माणसें पकडतात. या ना त्या उद्योगांत त्याला गुंतवतात. खादी घे. नाहीं तर गोरक्षण उचल. हरिजनसेवा कर. साक्षरता हातीं घे. राष्ट्रभाषाप्रचार कर. वर्धाशिक्षणपद्धतीची शाळा काढ. कागद करणें शीक. चर्मालयांत ये. मधुसंवर्धनविद्या शीक, मधमाशा पाळ. दारूबंदी उचल. स्वच्छता हातीं घे. एक ना दोन. शेंकडों गोष्टी तुम्हांला ते दाखवतील व सेवेंत ओढतील. असा हा महापुरुष आहे."

खेडेगांवांतून प्रचार कसा न्यावा ?—

३२ सालीं धुळे जेलमध्यें असतांनाच एके दिवशीं खानदेशांत काम कसें करावें याची चर्चा चालली होती. श्री. अण्णासाहेब दास्ताने म्हणाले, "कागदावर नीट सारी योजना आंखूं." विनोबाजी म्हणाले "कागदावर नको. ती योजना मग कागदावरच राहील. कागदी योजनांची मला भीति वाटते. आंखाआंखी नको. काम करायला लागा. त्यांतून आपोआप कामाला आकार येईल. तालुक्याला दहा तरी कार्यकर्ते हवेत. एकेकाकडे २५-२० गांवें असावीत. महिन्यांतून एकदां तरी त्या गांवाला प्रचारकाची भेट झाली पाहिजे. त्या त्या गांवचें गॅझेट प्रचारकानें तयार केलें पाहिजे. गांवची लोकसंख्या किती ? उद्योगधंदे काय ? बाहेरून कोणता माल येतो ? शेतसारा किती, कर्ज किती ? शाळा आहे का ? विहीर आहे का ? पक्षोपपक्ष गांवांत आहेत का ? गुंडांचा त्रास कितपत ? जातीजातींमध्यें सलोखा आहे का ? हरिजनांची स्थिति कशी आहे ? सारी माहिती हवी. प्रचारकानें पक्षातीत असावें. गांवांतील अमुक एका पक्षाचें होऊं नये. गांवकऱ्यांजवळ बोलावें. एकाला तरी आज सूत कांतायला शिकवीन, एकाला

तरी दोन अक्षरें शिकवीन, एकाला तरी गायीचेंच दूध पिणारा बनवीन, एखादा नवीन खादीधारी बनवीन, असा रोज संकल्प करावा. जीं गांवें आपल्याकडे घेतलीं असतील, त्या गांवांना वरचेवर भेट द्यावी. ज्यांची ओळख झाली, त्यांची वाढवावी. त्यांना नवीन विचार सांगावे. प्रेम वाढवावें. आपलें मित्रांचें वर्तुळ वाढवीत जावें. ३० सालीं एका वर्धा तहशीलमधून शंभरदीडशें स्त्रिया तुरुंगांत गेल्या. हा प्रचाराचा परिणाम. सेवामय व प्रेममय प्रचाराचा परिणाम. आश्रमाचा एक प्रचारक एकदां एका गांवीं गेला होता. तेथें कॉलरा होता. कॉलरा जावा म्हणून बोकडाची मिरवणूक काढून लोक त्याला पुरणार होते. बाहेर एक खोल खड्डा खणण्यांत आला होता. प्रचारकानें पुष्कळ सांगितलें कीं बोकड पुरून काय होणार ? हे जंतू असतात. पाणी उकळून प्या. परंतु कोण ऐकणार ? शेवटीं तो प्रचारक त्या खळग्यांत जाऊन बसला. मिरवणूक आली. तों त्या खड्ड्यांत तो प्रचारक राम-नामाची धून चालवीत बसला होता. तो म्हणाला, " मलाच पुरा. कॉलरा कधीं येणार नाहीं. " त्याची ती मरणान्तिक निष्ठा पाहून लोक विरघळले. रूढि बंद पडली. असा जिवंत, उत्कृष्ट प्रचार हवा. एकेका गांवांत स्वतःच्या विचारांचीं माणसें जोडित जा. प्रत्येक गांवांत आपला एक तरी बिभीषण हवा. म्हणजे रामाचें काम सोपें होईल. प्रत्येक कार्यकर्त्याला असें म्हणतां आलें पाहिजे कीं मी म्हणजे दहा माणसें; पंचवीस माणसें; शंभर माणसें. समजा जिल्ह्यांत शंभर कार्यकर्ते असले व प्रत्येकाच्या पाठोपाठ येणारीं शंभर माणसें असतील तर दहा हजारांची सत्याग्रही सेना तेथें उभी होते. खरें ना ? अशा रीतीनें कॉंग्रेसचा प्रचार, खादीचा व इतर गोष्टींचा प्रचार करीत जा. वातावरण भरून टाका. "

### स्वदेशीचा वाढता अर्थ —

नंदुबारला एकदां विनोबाजींनीं सांगितलें " स्वदेशीचा अर्थ दिवसें-दिवस वाढत असतो. परदेशी कापड न घेतां स्वदेशी गिरणीचें कापड वापरा-असें आपण पूर्वीं सांगत होतों. आतां तुम्ही देशी गिरणीचें कापड वापरीत असाल. परंतु स्वदेशीचा अर्थ आणखी वाढला. खेड्यां-तील जनतेला घांस देणारी खादी वापरणें म्हणजे शंभर टक्के स्वदेशी असा आतां अर्थ झाला. पूर्वीं सारी परदेशी साखर येत असे. आतां देशांत भरपूर साखर होते. तुम्ही म्हणाल आतां तर स्वदेशी साखर खातों ना? परंतु गूळ खाणेंच अधिक स्वदेशी. कारण गूळ घ्याल तर त्याचे पैसे शेतकऱ्यास जातील. खेड्यांत जातील. साखर घ्याल तर एका कारखानदारास जातील. ज्या वस्तू घेतल्यानें खेड्यांतील जनतेस आधीं साहाय्य मिळेल त्या घेणें म्हणजे संपूर्ण स्वदेशी होय."

### उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः —

एकदां विनोबाजींना एका विद्यार्थ्यानें प्रश्न केला " इंग्रजाजवळ तर शस्त्रें आहेत. आपण त्यांना कसें जिंकणार?" विनोबाजी वरील श्लोकचरण म्हणून म्हणाले "इंग्रजांचें खरें सामर्थ्य उद्योगधंद्यांत आहे. आपण आपले उद्योगधंदे वाढवूं या. ग्रामोद्योग वाढवूं या. आपल्या येथेंच तयार होईल तें घेण्याचा निश्चय करूं या. म्हणजे इंग्रजास जिंकतां येईल."

### खादी स्वस्तच—

खादी महाग म्हणणाऱ्यांना विनोबाजी एकदां म्हणाले " तुम्ही श्राद्ध, पक्ष, इतर दानधर्म यांत जो पैसा खर्च करतां तो करूं नका. खादींत सारें आलें. हे सारे पैसे खादीविक्रींत घालाल तर खादी मग

महाग वाटणार नाहीं. खादी विकत घेण्यानें गुप्तदान होतें. कोठल्या तरी कांतणाऱ्याला दोन दिडक्या मिळतात. तो तुम्हांला दुवा देतो. पुनः हें दान श्रमहीनास नसून श्रम करणाऱ्यास आहे."

धर्म उघड्यावर शिकवा—

जो धर्म परधर्मीयांसमोर शिकवतां येत नाहीं, त्या धर्मात कांहीं तरी उणीव आहे असें विनोबाजी एकदां म्हणाले. माझा धर्म सर्वांसमोर सांगायला मला संकोच नाहीं वाटतां कामा. खरा धर्म सर्व मानवांना रुचेल. आपले धर्म संकुचित असले म्हणजे मग चार भिंतीमध्यें ते शिकवावे लागतात. ज्या धर्मांत दुसऱ्या धर्माची निंदा नाहीं, जो धर्म उदार व उन्नत करतो, तो कोठेंहि सांगायला काय हरकत? कोणीहि ऐकायला काय हरकत?

काकांना तिकडेच राहूं दे व सेवा करूं दे—

एकदां विनोबाजींस एकानें विचारलें "काकासाहेब कालेलकर गुजराथेंत कां राहतात? गुजराथींत कां लिहितात? ते महाराष्ट्रांत कां येत नाहींत?" विनोबाजी म्हणाले "पूर्वी आपण महाराष्ट्रीयांनीं गुजराथवर स्वाऱ्या केल्या. गुजराथवर आपण साम्राज्यशाही आक्रमण केलें. गुजराथी भाषेंत महाराष्ट्रीयांबद्दल अनादराचे शब्द आहेत. आपण पूर्वी केलेलें पाप धुऊन टाकण्यासाठीं गुजराथची सेवा केली पाहिजे. काकांना तिकडेच राहूं दे व सेवा करूं दे."

साहित्यसंमेलनांत जात जा—

एकदां मी नालवडीस गेलों होतों. ३३।३४ सालांतील गोष्ट असेल. विनोबाजी व मी फिरायला गेलों होतों. ते बोलत होते, मी

ऐकत होतों. ते म्हणाले “ तुम्ही साहित्य संमेलनास कां नाहीं जात ? आपलीं माणसें तेथें गेलीं पाहिजेत. श्रीधर, महीपति वगैरेंच्या पोथ्यांच्या नवीन संक्षिप्त आवृत्ती काढल्या पाहिजेत. त्यांचेच ग्रंथ अद्याप राष्ट्रीय ग्रंथ आहेत. ”

“ मीहि कलापूजक आहें ”—

एकदां एक रसिक विनोबाजींकडे आला व एक सुंदर चित्र त्यांना दाखवूं लागला. विनोबाजींनीं जरा पाहिलें. तो गृहस्थ म्हणाला “तुम्हांला कलेची गोडी नाहीं. हा पहा येथला हिरवा रंग, हा गुलाबी.” विनोबाजी म्हणाले “ माझ्याबरोबर चला. माझी कलोपासना दाखवितों. ” दोघे निघाले. विनोबाजींचीं पावलें हरिजनवस्तीकडे वळलीं. तो कलापूजक कुरकुरूं लागला. “इकडे कोठें घाणींत जातां” म्हणाला. विनोबाजी म्हणाले “ माझें कलामंदिर इकडेच आहे. ” हरिजनवस्ती आली. तेथें हरिजनांचीं निःसत्त्व, अशक्त मुलें होतीं. विनोबाजी म्हणाले तूं तें चित्र ५० रुपयांस विकत घेतलेंस. ते ५० रुपये या मुलांना दूध देण्यांत खर्च केले असतेस तर या मुलांच्या फिकट चेहऱ्यांवर थोडा गुलाबी रंग आला असता. हीं देवाचीं चित्रें फुकट जात आहेत. आणि निर्जीव चित्रें तुम्ही उराशीं धरीत आहांत. आहे ना मी रसिक ? ही माझी कलोपासना. या गरिबांचीं तोंडें फुलविणें ही माझी कला.”

हिंदीचा प्रचार—

राष्ट्रभाषेचा प्रचार ही अत्यन्त आवश्यक गोष्ट आहे. सर्वांना समजेल अशी हिंदी आपणांस बोलतां आली पाहिजे. एकदां एक मलबारकडचा पुरुष विनोबाजींकडे आला होता. आपण कोणतें कार्य

करावें यासंबंधीं सल्ला घेण्यासाठीं तो आला होता. विनोबाजी त्याच्या-जवळ हिंदी बोलूं लागले. त्याला तें समजेना. तेव्हां विनोबाजी म्हणाले, " अद्याप हिंदीहि समजत नाहीं. मग आधीं हिंदी शिक-ण्याचेंच कार्य सुरू करा." त्या माणसावर विनोबाजींच्या त्या शब्दांचा विलक्षण परिणाम झाला. तो हिंदी शिकूं लागला. आणि पुढें हिंदी–प्रचारास त्यानें वाहून घेतलें. त्यानें एक आश्रम सुरू केला आहे. त्याला " विनायकाश्रम " असें विनोबाजींचें नांव त्यानें दिलें आहे.

डॉक्टरास सल्ला—

एकदां एक डॉक्टर विनोबाजींकडे आला. तो म्हणाला " मी दवाखाना चालवणार आहें. गरिबांस दोन आणे, श्रीमंतांस सहा आणे असा दर ठेवणार आहें." विनोबाजी म्हणाले, " तूं असा भेद नको करूं. जो दर ठेवशील तो सर्वांना सारखा ठेव. श्रीमंतांस स्वाभिमान असेल तर ते आपण होऊन तुला अधिक देतील. गरिबांसाठीं दर ठेवशील तोच श्रीमंतांस. सूर्य आपले किरण सर्वत्र सारखे पाडतो. चंद्राचे किरण राजवाड्यावर वा झोंपडीवर समतेनें पडत असतात. " त्या डॉक्टरानें विनोबाजींच्या सल्या-प्रमाणें केलं.

बोर्डिंग बंद करा असें लिहूं का ?—

एका बोर्डिंगांत विनोबाजींस घेऊन गेले. तें ओस्वाल मारवाडी बोर्डिंग असावें असें वाटतें. विनोबाजी म्हणाले " जातीय बोर्डिंगें कधीं बंद करणार ? सर्वांना जवळ घेणारीं बोर्डिंगें कां नाहीं काढीत ? बरें मारवाडी बोर्डिंग तरी म्हणायचें ? तेंहि नाहीं. ओस्वाल बोर्डिंग असें पुन्हां त्यांत आणखी. काय देऊं मी अभिप्राय ? हें बोर्डिंग बंद

करा असें लिहूं का ? " विनोबाजींना जातीयतेचा वारा बिलकुल सहन होत नाहीं.

वजन वाढवलें—

विनोबाजींची प्रकृति अशक्त. एकदां श्री जमनालालजी वगैरे महात्माजींस म्हणाले " तुम्हीच आतां विनोबाजींकडे लक्ष द्या. " शेवटीं महात्माजी विनोबाजींस म्हणाले " हें बघ, तुला आतां मला ताब्यांत घेतलें पाहिजे. एरव्हीं तुझी प्रकृति सुधारणार नाहीं. "

" तीन महिन्यांची मुदत द्या " विनोबाजी म्हणाले.

आणि ते प्रकृतीकडे वळले. पायीं खूप रपेट करूं लागले. उन्हांत खणूं लागले. टमाटो वगैरे भरपूर घेत. आणि दोन तीन महिन्यांत त्यांनीं आपलें वजन जवळजवळ २० पौंड वाढविलें. १२५ पौंड वजन झालें. मी त्यांना भेटायला गेलों होतों. तेव्हां म्हणाले " आतां मल्ल झालों आहें कीं नाहीं ? "

जवळ लोक उपाशी, तुम्ही काय करीत आहांत ?—

एकदां जमनालालजी प्रार्थनेच्या वेळेस विनोबाजींकडे आले. कांहीं तरी आज प्रार्थनेनंतर सांगा असें ते म्हणाले. त्यावेळेस विनोबाजी पवनारला रहात होते. त्या गांवांत आदल्या दिवशींच विनोबाजींनीं कांहीं उपाशी माणसें पाहिलीं होती. आणि विनोबाजी त्याच करुण प्रसंगावर बोलले. अति कठोरपणें बोलले. " इकडे लोक तुमच्या शेजारच्या गांवीं उपाशी मरत आहेत. तुम्ही काय करीत आहांत ? काय तुम्हांला सांगूं ? " खूप बोलले.

आणि त्या गांवांत विनोबाजींनीं उद्योगमंदिर काढलें. गांवांतील बेकारांनीं तेथें यावें, कांतावें. त्यांना मजुरी मिळेल. अशी व्यवस्था झाली. मुलें येऊं लागलीं. विनोबाजी त्यांच्यांत मिसळत. प्रथम उजव्या

मग दोन्ही हातांनीं कांतायला शिकवीत. त्यांच्याजवळ प्रेमानें बोलत. घरची चौकशी करीत. तें दृश्य मोठें गोड वाटे.

अजातशत्रु—

विनोबाजींकडे श्रीमंत येतात तसेंच गरीबहि येतात. आजुबाजूच्या गांवांतील किसानमंडळींहि येते. कधीं हे गरीब शेतकरी विनोबाजींकडे येऊन संतापानें बोलत. एकदां एक कळकळीचे शेतकऱ्यांतीलच कार्यकर्ते त्यांच्याकडे आले होते. ते रागानें बोलत होते. "हे सारे जमीनदार नष्ट केले पाहिजेत. हे साप आहेत." विनोबाजी म्हणाले "साप आपण निर्विष करूं म्हणजे झालें ना? ते मारायचे कशाला? जुलुम करण्याची त्यांची सत्ता काढून घेऊं म्हणजे झालें. जुलुम करण्याचीं त्यांचीं साधनें दूर करूं."

गांवांतील लग्न सर्वांचें असावें—

एकदां खेड्यांत बोलतांना ते म्हणाले "गांवांतील श्रीमंत असतो तो आपल्याकडचें लग्न थाटांत करतो. गरिबालाहि तसें करावेंसें वाटतें. तो मग कर्ज काढतो. गांवांत कोणाचें लग्न असेल तर तें सर्व गांवानें करावें. म्हणजे सर्वांचीं लग्नें चांगलीं साजरीं होतील. जणुं त्यावेळेपुरतें तरी सर्व गांवाचें एक कुटुंब. सर्व गांवाला तो आनंदाचा दिवस."

सुंदर नांवें ठेवतात—

खान्देशांतील खेड्यांतून "गडबड, चावदस" अशीं पुष्कळ नांवें असतात. विनोबाजींच्याकडे हीं मुलें गेलीं म्हणजे त्यांचीं नांवें बदलत. अंमळनेरच्या एका मुलाचें नांव गडबड होतें. गडबडचा तेथें

" गोपाळ " झाला. चावदासला असेंच दुसरें नांव ठेवण्यांत आलें. चावदस म्हणजे चतुर्दशीला झालेला. आपल्या प्राचीन गृह्यसूत्रांत मुलांना नांवें कशीं ठेवावीं हें सांगतांना " गोड नांवें ठेवावींत. कठोर वर्णांचीं नसावींत—" इत्यादि सांगितलें आहे. गोड नांवांत एक प्रकारची गोडी असते. एका कार्यकर्त्याचें नांव अच्युतराव देशपांडे असें आहे. निजामाच्या राज्यांतील हे एक त्यागी कार्यकर्ते आहेत. विनोबाजी त्यांना " अच्युतस्वामी " म्हणायचे. परंतु लोकांनीं त्यांना अच्युतराव केलें. विनोबाजी म्हणाले " मी त्याला चांगला अच्युत-स्वामी करूं पहात होतों. परंतु लोकांना रुचेना. स्वतःच्या मनाचा स्वामी होऊन सेवा करणारा बरा नाहीं का ? "

आश्रमांत हिंसा नाहीं—

आश्रमांत सर्वत्र निर्भयता आहे. साप, विंचू यांना कोणी मारीत नाहींत. खुशाल त्यांना पकडतात व दूर नेऊन सोडून देतात. मी एकदां गेलों होतों. तों तेथें एक दहाचा आंकडा असलेला कृष्णसर्प एका पिंजऱ्यांत होता. त्याला पकडून त्यांत ठेवण्यांत आलें. परंतु लौकरच त्याला सोडून देणार होते. वर्ध्याला पूर्वी महिलाश्रम व कन्याश्रम होता. त्यांतील मुलीहि खुशाल नांगी धरून विंचू पकडीत व शेतांत नेऊन सोडीत. अशी निर्भयता तेथें असे.

पहिले सत्याग्रही—

अशा या थोर विनोबाजींना १९४० सालीं महात्माजींनीं पहिला सत्याग्रही म्हणून जाहीर केलें. महात्माजींच्या सर्वांगीण साधनेंत विनोबाजींच्या इतका कोण रमला ? स्वर्गीय महादेवभाईंनीं लिहिलें " उत्तरोत्तर ज्याच्या जीवनांत विकास होत आहे अशी महात्माजीं-

शिवाय दुसरी व्यक्ति मीं पाहिली ती विनोबाजींची. आणि विनोबाजी खरेंच परिणतप्रज्ञ होत चालले आहेत. तीस सालापूर्वी ते फारसें बोलत नसत. फार कोठें जात नसत. परंतु ३२ सालीं धुळें जेलमध्यें आले. त्यांनीं गीतेवर प्रवचनें दिलीं. अनेकांजवळ बोलले. चर्चा होत. प्रश्नोत्तरें होत. लोकांना विचारांची भूक आहे ही गोष्ट त्यांनीं ओळखिली. थोडें फार आलें गेलें पाहिजे, बोललें पाहिजे, असें त्यांना वाटलें. १९३३ सालीं वर्ध्यास श्रीलक्ष्मीनारायणमंदिरांत नवीन ग्रंथालय व वाचनालय यांचें उद्घाटन करतांना त्यांनीं प्रवचनांत सांगितलें " धुळें जेलनें माझ्यांत पुष्कळ फरक केला. विचार प्रसाराचीहि आवश्यकता असते. विचार मुद्दाम कोणावर सक्तीनें लादूं नये. किंवा अजिबात आपल्या विचारांचा प्रचार करायचाच नाहीं, सत्य आपोआप पसरेल, असेंहि नये म्हणूं. आग्रह न धरतां आपण आपले विचार फैलावीत राहिलें पाहिजे. " विनोबाजी वाढते आहेत. त्यांचा पूर्वीचा तितका कठोर स्वभाव आतां राहिला नाहीं. ते अधिक प्रेमळ झाले आहेत. आंबा मधुरतर होत आहे.

विनोबाजींची गाढी विद्वत्ता, प्रखर बुद्धिमत्ता, अपूर्व स्मरणशक्ति, त्यांची ध्येयनिष्ठा, त्यांचें धगधगीत वैराग्य, त्यांची सेवा-वृत्ति, त्यांची ईश्वरपरायणता, त्यांची साधुता, त्यांची तपश्चर्या, त्यांची अलोट इच्छाशक्ति, त्यांचा नियमितपणा व व्यवस्थितपणा, त्यांची अनासक्ति, त्यांची नम्रता, त्यांची निर्भयता, त्यांची भेदातीत वृत्ति, कशाचें मी वर्णन करूं ? किती त्यांचें गुण सांगूं ?

म्हणून ते पहिले सत्याग्रही झाले. आणि महात्माजींनीं त्यांची निवड केल्यावर त्यांनीं वडोद्यास वडिलांना पत्र लिहिलें :

" तुमच्या कृपेचा व आशीर्वादाचा हा परिणाम. " असें त्यांनीं त्यांत लिहिलें.

### विनोबाजींचे वडील—

विनोबाजींचे वडील बडोद्यास आहेत. ते पेन्शनर आहेत. ते एकटेच असतात. दूध घेतात. ७० वर्षांचें त्यांचें वय. परंतु आंतां आतांपर्यंत सारे केस काळे होते. एकहि पांढरा नव्हता झाला. ते उंच आहेत. तेजस्वी दिसतात. करारी व निग्रही आहेत. मुलांच्या बाबतींतील त्यांच्या सर्व आकांक्षा तशाच राहिल्या. विनोबाजींनीं संशोधक व्हावें अशी त्यांची इच्छा होती. धाकट्या शिवाजीनें शिल्पकार व्हावें असें त्यांना वाटे. परंतु तिन्ही मुलगे आश्रमीय जीवनाचे झाले. नरहरपंत तरीहि शांतपणें आपलें जीवन नेत आहेत. त्यांना कदाचित् आज कृतार्थताहि वाटत असेल. मागें रंगसंशोधनांत ते गुंतले होते. साडीसाठीं गुळीचा व काळा रंग त्यांनींच करून दिले. महात्माजी त्यांना कायमचे वर्ध्यास येऊन रहा, चरखासंघांत रहा, असें सांगत होते. परंतु त्यांनीं स्वतंत्रपणें बडोद्यास राहणेंच पसंत केलें. अलीकडे ते संगीताच्या संशोधनांत रमले आहेत. तबल्याचे सारे बोल गोळा करीत आहेत. एक पुस्तक प्रसिद्धहि केलें. आणखीहि भाग होतील. वडिलांचें असें स्वाभिमानी, निःस्पृह व कर्ममय जीवन चाललें आहे.

### विनोबाजींचे भाऊ—

बाळकोबा व शिवाजी असे दोनच भाऊ आतां विनोबाजींस आहेत. धाकटा दत्ता इन्फ्लुएंझांत वारला म्हणून मागें सांगितलेंच. बाळकोबा हे क्षयानें कित्येक वर्षें आजारी होते. आतां जरा बरे आहेत. परंतु क्षयांत कधीं अंडीं वा कॉडलिव्हर हे पदार्थ त्यांनीं घेतले नाहींत. आपलीं व्रतें सोडलीं नाहींत. शांतपणें कित्येक वर्षें ते पडून आहेत. ते सतार उत्कृष्ट वाजवतात. आणि शिवाजी सारखे घुमत असतात.

शिवाजींना चित्रकला येते. खोल मनन करणारे, व्याकरणांत पारंगत, वैराग्यशील व व्रती असे ते आहेत. हे तिघे भाऊ म्हणजे कधीं कधीं ज्ञान, भक्ति, कर्म यांचे अवतार असे वाटतात. परंतु ज्ञान, भक्ति व कर्म तिन्ही एकत्र करण्याची तिघांची प्रवृत्ति आहे. अशीं हीं तीन थोर भावंडें आहेत. तिघांना प्रणाम.

ज्ञान, भक्ति व कर्म--

विनोबाजींनीं जीं मननवचनें लिहून ठेविलीं आहेत. त्यांत ते एके ठिकाणीं लिहितात "ज्ञानानें सर्व साधीन असा अहंकार होता. ज्ञानानें निर्मळ होईन असें वाटे. परंतु यश नाहीं. मग कर्मांत सारखें रमायचें व दमायचें आणि अशा रीतीनें मन मारायचें असें ठरविलें. परंतु कर्मानेंहि चित्तावरचे सूक्ष्म मळ जातील असें दिसेना. शेवटीं भक्तीचा आसरा केला व आशा आली." हें वचन मी स्मरणानें सांगत आहें. विनोबाजींचें हेंच तत्त्वज्ञान आहे. हेंच गीतेचें तत्त्वज्ञान. कर्म, ज्ञान व भक्ति हीं एकमेकांत मिसळा.

तुरुंगांतून बाहेर येतांच लगेच पुन्हां तुरुंगांत--

पहिले सत्याग्रही म्हणून शिक्षा झाली. सुटून येतांच पुन्हां ते निघाले. परंतु पुढें वैयक्तिक सत्याग्रह थांबला. देशांत निराळें वातावरण झालें. क्रिप्स येणार, स्वराज्य मिळणार असें वाटूं लागलें. परंतु शेवटीं मनोरथ मातींत गेले. आणि महात्माजी शेवटच्या संग्रामास उभे राहिले. आपल्या सर्व संस्था होमावयास उभे राहिले. सर्वांची तयारी होऊं लागली. मुंबईस आठ ऑगस्टचा ठराव झाला. अमर अशी १९४२ ऑगस्टची ९ तारीख उजाडली. महात्माजी

व काँग्रेसच्या कार्यकारिणी समितीचे सभासद यांना अटक झाली. आणि विनोबाजींसहि अटक झाली.

'तुम्ही स्वतंत्र आहांत असे रामनामाप्रमाणें सांगत जा'—

आश्रमीयांनी विनोबाजींस विचारिलें, " कार्यक्रम काय ? आम्ही काय करूं ? " विनोबाजी म्हणाले " तुम्ही स्वतंत्र आहांत असें जनतेंत सांगत सर्वत्र जा. रामनामाप्रमाणें हा मंत्र सर्वत्र फैलावा.जा !"

विनोबाजी आज तुरुंगांत आहेत. हजारों लोक तुरुंगांत आहेत. विनोबाजी जेथें जातील तेथें पावित्र्य फुलवतील. सेवेचा संदेश देतील. ऐक्य व संयम शिकवतील. गरिबांची सेवा करा सांगतील. त्यांचें सारें जीवन हेंच नाहीं कां सांगत ?

माझ्या डोळ्यांसमोर त्यांची मूर्ति—

माझ्या जीवनावर विनोबाजींचा खूप परिणाम झाला आहे. मी त्यांच्याजवळ फार बोललों नसेन. परंतु ते माझ्या हृदयांत आहेत. मीं एकदां त्यांना म्हटलें " मला तुम्हांला प्रश्न नाहीं विचारतां येत. इतर लोक तुम्हांला प्रश्न विचारतात. " ते मला म्हणाले, " मीं सांगावें व तुम्हीं ऐकावें असेंच आपलें नातें आहे. " मी त्यांच्या-पासून दूर राहून त्यांची ऊब घेतों. धुळें तुरुंगांत असतांना त्यांनीं मला एक अति सुंदर पत्र लिहिलें होतें. तें रहावत नाहीं म्हणून तुम्हांला सांगतों :

पवनार, ता. १२-१२-४१

" श्री गुरुजी

तुम्ही बहुधा अजून मंदिरांत असाल. आम्हांला सध्यां मंदिरांतून धक्के मारून बाहेर काढण्यांत आलें आहे. पाहूं त्याचें काय करायचें

तें. तुमचें स्मरण किती वेळां आणि किती तीव्रतेनें होतें तें शब्दांत कसें लिहावें ? आणि त्याची गरज तरी काय ? माझ्या शब्दांत एवढी शक्ति तरी कोठें आहे ? तुमचीं आमचीं हृदयें एकरूप आहेत. अनेक जन्मांचे आपण सोबती आहोंत. कसलेहि भेद—कल्पनेचे, काळाचे आणि स्थळाचे—आपणांस अलग करूं शकत नाहींत. मग भेटीची तळमळ कशाला ? पण कधीं कधीं होते खरी. आणि हीच माझी मानवता. दुर्बळ पण सरळ, प्रेमळ आणि प्रांजळ.

पण त्यांतला दुबळेपणा मी टाकूं इच्छितों. पोपूं इच्छित नाहीं. म्हणून अंतरवृत्तीनें जरूर तेव्हां तुमच्याजवळ येऊन जातों. आणि बाह्य भेटीची आकांक्षा आवरतों.

एकवेळ येईल, जेव्हां तुमच्या माझ्या बाह्य प्रवृत्तीहि एकरूप होतील अशी मी आशा सेवून आहें. सृष्टि मिथ्या म्हणणाऱ्या शंकरादि विचारकांचा हल्लीं कित्येकांना राग येतो. पण मला तर ती वस्तु उघड्या डोळ्याला दिसते. हें बाहेरचें सर्व जग—देहासकट—पार विरून विरघळून गेलें आहे. आकाशहि नाहीं, अनाकाशहि नाहीं. आणि केवळ मी, एकच एक आंतबाहेर येऊन जाऊन आहें असें अनुभवतें.

ह्या चार ओळी तरी कशाला ? हरीला माहीत !

विनोबाचे सप्रेम प्रणाम. ”

विनोबाजींची आध्यात्मिक वृत्ति, त्यांची प्रेमळता व सरळता, सारें ह्या पत्रांत प्रतिबिंबित झालें आहे. हें पत्र वाचून मी सद्गदित झालों होतों. त्यांनीं दुसऱ्या एका पत्रांत लिहिलें होतें, “ चैतन्यमय आत्म्याला चैतन्यमय भेटच शोभते. ”

सूत्रयज्ञाचे वेळेस सर्वांचें स्मरण करतों—

पहांटे चार वाजतांची व सायंकाळची आठ वाजतांची त्यांची प्रार्थना कधीं टळली नाहीं.

अहिंसा, सत्य, अस्तय, ब्रह्मचर्य, असंग्रह
शरीरश्रम, अ-स्वाद सर्वत्र भयवर्जन ॥
सर्वधर्मीं समानत्व, स्वदेशी, स्पर्शभावना
हीं एकादश सेवावीं नम्रत्वें व्रतनिश्चयें ॥

हे श्लोक प्रार्थनेनंतर आम्हीं सर्वत्र म्हणतों ते विनोबाजींचेच. आश्रमीयांचीं अकरा व्रतें त्यांत आहेत. यांची अहोरात्र स्मृति ठेवायची. प्रार्थनेच्या नंतर विनोबाजी कधीं कांहीं सांगतात. कधीं सायंप्रार्थनेनंतर मौन ठेवतात. रोज दुपारीं बारा वाजतां अर्धातास नियमानें कांततात. याला ते सूत्रयज्ञ म्हणतात. एरव्हींहि कांततात. परंतु बारा वाजतांचें हें यज्ञीय कांतणें. त्यावेळेस ते मौन पाळतात. ते एकदां म्हणाले सूत्रयज्ञाचे वेळेस सर्वांची मनोदय भेट घेत असतों. तें सूत सर्वांशीं जणुं जोडीत असतें. मित्रांशीं, सहकाऱ्यांशीं, दरिद्रनारायणाशीं तें सूत जोडीत असतें. ”

आकाशदर्शन—

विनोबाजींना आकाश-दर्शन फार प्रिय आहे. आकाशाकडे पहात झोंपतात. आकाशाकडे पहात उठतात. आकाशाची ' व्यापकता, अलिप्तता का ते शिकत असतात ? किती भाव त्यांच्या मनांत असतील !

कसे दिसतात, कसे बोलतात—

विनोबाजी उंच आहेत. निर्मळ वर्णाचे आहेत. नाक सरळ तर-तरित आहे. भाल-प्रदेश उंच आहे. हात जरा लांब आहेत. पंचा नेसतात. अंगावर एखादा फडका असतो. नाहींतर पंचाशिवाय कांहीं नाहीं. बोलतांना पुष्कळ वेळां उजवा हात डाव्या खांद्यावर छातीला लागून असा धरतात. भाषण करतांना आरंभ अगदीं हळू करतात. परंतु पुढें खूप आवाज उंच चढतो. व्याख्यानांतून अभंग वगैरे येतात. विनोबाजींचा कंठ गोड आहे. त्यांचे अभंग ऐकत रहावे असें वाटतें. ते तन्मय करतात. कधीं कधीं ते अपार स्फूर्तीनें बोलतात. एकदां धुळयास लोकमान्य उद्यानांत ते बोलले. घरीं आल्यावर म्हणाले, "मी आज असें इतकें बोलेन याची कल्पना नव्हती. जणुं मी नव्हतों बोलत. कोणी बोलवीत होतें." एकदां अंमळनेरास लोक-मान्यांच्या पुण्यतिथीचे दिवशीं बोलतां बोलतां लोकमान्यांचें जोरानें स्मरण येऊन त्यांचे डोळे भरून आले. कांहीं वेळ त्यांना बोलवेना. लोकमान्यांविषयीं किती त्यांची भक्ति ! आणि धुळें येथें राजवाडे–संशोधन–मंदिराच्या उद्‌घाटनाचे वेळेस म्हणाले "पाश्चिमात्य लोक हिंदुस्थानच्या इतिहासाविषयीं आदरानें लिहीत नाहींत असें आपण म्हणतों. परंतु ज्या इतिहासाला आजच्या लोकांसारखीं शेंदाड फळें लागतात, तो इतिहासवृक्ष सतेज आहे असें त्यांनीं कां म्हणावें ? तुमचा इतिहास तुमच्या आजच्या कृतीनें उज्ज्वल होईल. तुम्ही जर उज्ज्वल कृति कराल जर तुमची परंपरा व तुमचा इतिहास थोर आहे असें जग म्हणेल. नुसतीं कागदपत्रें अग्निसंरक्षक भवनांतून ठेवून इतिहास उज्ज्वल होत नाहीं. तुम्ही कर्तव्याप्रमाणें वागाल तर हीं सारीं कागदपत्रें भस्म झाल्यासारखींच आहेत." तें भाषण माझ्या

कानांत घुमत आहे. त्या टिळक उद्यानांतील सभेंत ते असेंच प्रखर बोलले होते. " तो प्राचीन ऋषि सांगत आहे कीं तुम्ही आपल्याच घरांत कोठारें भराल तर मराल. जो दुसऱ्यास न देतां घरांत धन-धान्य सांठवतो, तो धनधान्य सांठवीत नसून आपलें मरण सांठवीत आहे.

"मोघमन्नं विन्दते अप्रचेताः । सत्यं ब्रवीमि वध इत्स तस्य
न अर्यमणं पुष्यति नो सखायं । केवलाऽघो भवति केवलाऽदी"

" अनुदार मनुष्याला धनधान्य मिळून काय फायदा ? खरोखर मी सांगतों, तें त्याचें मरण आहे. जो मित्रांना पोषित नाहीं, योग्य लोकांस देत नाहीं, केवळ स्वतःचेंच फक्त पाहतो तो केवळ पापरूप होय. असें हा ऋषि गर्जून सांगत आहे. सावध व्हा. आपला कितीसा त्याग, काय करीत आहोंत देशासाठीं ? मागील महायुद्धांत जर्मनीनें ५० लाख लोक मरायला उभे केले. त्या प्रमाणांत हिंदु-स्थानांत ४॥ कोटी लोक मरायला तयार झाले पाहिजेत. आपण त्यागांत कमी, सेवेंत कमी. आपणांस वानप्रस्थाश्रम सांगितला आहे. वानप्रस्थाश्रम आपण पाळूं तर हजारों सेवक व प्रचारक राष्ट्रास मिळतील. परंतु आपण धर्महीन, कर्महीन, केवळ करंटे झालों आहोंत. महात्माजींसारखे महापुरुष जागे करीत आहेत.

मनुष्यत्वं मुमुक्षत्वं महापुरुषसंश्रयः

या तीन गोष्टी दुर्लभ असतात. तुम्ही माणसें आहांत. मुक्त होण्याची तुम्हांस इच्छा आहे. महात्माजींसारखा महापुरुष नेता मिळाला आहे. परंतु तुम्ही उठाल तेव्हां. त्याग करायला निघाल तेव्हां. सर्व राष्ट्रें आज तराजूंत घातलेलीं आहेत. जें राष्ट्र त्यागांत सेवेंत कमी ठरेल तें दूर फेकलें जाईल."

असें कितीतरी त्या दिवशीं ते बोलले. मी काय काय सांगूं ?

विनोबाजींची वाणी माझ्या कानांत घुमत असते. त्यांची मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर असते. त्यांचें गोड हंसणें आठवतें. पाठीवर हात मारणें आठवतें. त्यांच्या मी किती गोष्टी सांगूं ? परंतु मी तर दूरचा. त्यांच्या सान्निध्यांत तपें ज्यांनीं दवडलीं ते त्यांच्या शेंकडों आठवणी सांगतील. त्यांचे बंधु शिवाजी यांनीं त्यांचें चरित्र लिहून ठेविलें आहे असें कळतें. तें प्रसिद्ध होईल तेव्हां वाचा. तोंपर्यंत या वेड्यावांकड्या आठवणी, या गोष्टी, यांतील संक्षिप्त विचार गोड करून घ्या.

विनोबाजी महाराष्ट्राचें पावित्र्य व सामर्थ्य आहेत. ते महाराष्ट्राचें व भारताचें भूषण आहेत. आपण त्यांच्या चरित्रापासून स्फूर्ति घेऊं या. सेवादलांतील सैनिकांनो, विनोबाजींचा हा दिव्य भव्य आदर्श डोळ्यांसमोर ठेवा. श्रद्धेनें, निश्चयानें, प्रेमानें, त्यागानें अखंड भारताची सेवा करा. हिंदु–मुसलमान, ब्राह्मण–ब्राह्मणेतर, स्पृश्यास्पृश्य इत्यादि भेद विसरून एका भारतमातेचीं लेंकरें बनून नव हिंदुस्थान उभा करण्यासाठीं कायावाचामनें करून प्रयत्न करा. गरिबांचे संसार सुंदर व्हावेत, त्यांना अन्नवस्त्र मिळावें, ज्ञान मिळावें, विश्रांति मिळावी, कलेचा आनंद मिळावा, त्यांच्या जीवनाचा संपूर्ण विकास व्हावा म्हणून झटत रहा.

वन्दे मातरम्

# श्री. साने गुरुजी यांचें समग्र वाङ्मय

### कादंबऱ्या

| | |
|---|---|
| श्यामची आई | १–४–० |
| श्याम ( खंड १ला ) | १–४–० |
| श्याम ( खंड २रा ) | १–८–० |
| श्याम ( खंड ३ रा ) जप्त. | |
| धडपडणारीं मुलें | १-१२-० |
| क्रान्ति | ३–०–० |
| आस्तिक | २–८–० |
| पुनर्जन्म | २–८–० |
| सती | २–०–० |
| गोड शेवट | ३–८–० |
| तीन मुलें | २–८–० |

### कथासंग्रह

| | |
|---|---|
| विश्राम | १–०–० |
| त्रिवेणी | १–४–० |
| गोड गोष्टी (भाग १ ते १०) | ६–२–० |
| सोन्यामारुती | १–०–० |
| सोनसांखळी | ०–६–० |
| जीवन-प्रकाशनं | ०–३–० |

### नाटकें

| | |
|---|---|
| अस्पृश्योद्धार ( अप्राप्य ) | ०–५–० |
| निळापक्षी ( अप्राप्य ) | १–४–० |
| तें आपलें घर | ०–८–० |

### काव्य

| | |
|---|---|
| पत्री ( अप्राप्य ) | १–८–० |
| स्त्री-जीवन ( भाग १ ला ) | १–८–० |
| स्त्री-जीवन (भाग २ रा) | १–४–० |

### प्रबंध

| | |
|---|---|
| भारतीय संस्कृति | २–४–० |
| राष्ट्रधर्म | २–०–० |
| समाजधर्म | १–८–० |
| खेड्यांत जाऊन काय कराल ? | ०–४–० |
| स्वदेशी समाज | ०-१२-० |
| कला व इतर निबंध | ०–८–० |
| संस्कृतीचें भवितव्य | १–०–० |
| कला म्हणजे काय ? | ३–०–० |
| गीता-हृदय | ०–८–० |
| गौतमबुद्ध | १–०–० |

### चरित्रें

| | |
|---|---|
| नामदार गोखले | २–०–० |
| ईश्वरचंद्र विद्यासागर | ०–८–० |
| इतिहासाचार्य राजवाडे | ०-१२-० |
| बेंजामिन फ्रँकलीन | ०–४–० |
| शिशिरकुमार घोष | ०–४–० |
| रवींद्रनाथ टागोर | ०–४–० |

**सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, १२ टिळक रोड, पुणें २**

प्रकाशित

पुरोगामी
–जा[illegible]के

जीवनयोग
–ना. ग. जोशी

गीता-हृदय ( दुसरी आवृत्ति )
–साने गुरुजी

विनोबाजी भावे
–साने गुरुजी

देशबंधु दास
–साने गुरुजी



एकमेव विक्रेते

## सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला

१२ टिळक रोड, पुणे २.



आगामी

साने गुरुजीकृत

संध्या ( कादंबरी )
रामाचा शेला ( कादंबरी )
पत्री ( निवडक वेचे )
चित्रकार रंगा ( कादंबरी )

